**मौजे काले-२, ता.कराड, जि. सातारा येथील उपकेंद्र त्याच तालुक्यातील मौजे धोंडेवाडी येथे स्थलांतरीत करण्यास मान्यता.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्थलांतर-२०१८/ प्र.क्र.६१/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: - ७ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा</u>

**१) सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकें/उपकेंद्र/दवाखाने),आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-७अ/टे-७/उपकेंद्र/काले २/धोडेवाडी/स्थलांतर/ सातारा/ ८५४-५७/२०१७, दि.२६.०२.२०१८.**

<u>प्रस्तावना</u>

मौजे काले-२, ता.कराड, जि.सातारा या गावात प्राथमिक आरोग्य कार्यरत आहे. तसेच, एकाच गावात काले-१ व काले-२ अशी दोन उपकेंद्र आहेत. मौजे धोंडेवाडी, ता.कराड, जि.सातारा हे गाव डोंगरी भागात मोडत असून, या ठिकाणी दळणवळणाची सोय नसल्याने, सदर दोन उपकेंद्रांपैकी मौजे काले-२ हे उपकेंद्र त्याच तालुक्यात स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u>

मौजे धोंडेवाडी, ता.कराड, जि.सातारा हे गाव डोंगरी भागात मोडत असून, या ठिकाणी दळणवळणाची सोय नसल्याने, मौजे काले-२ हे उपकेंद्र त्याच तालुक्यातील मौजे धोंडेवाडी येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) स्थलांतरीत ठिकाणी उपकेंद्र कार्यान्वित होऊ शकेल अशी इमारतीची व्यवस्था व कर्मचारी निवासाची व्यवस्था असणे आवश्यक राहील. ज्यायोगे या जागेत बाह्य रूग्णसेवा, स्त्री रूग्ण तपासणीसाठी स्वतंत्र व्यवस्था, प्रसुतीसाठी व्यवस्था, कर्मचारी बसण्याची व्यवस्था, रूग्णवाहिका असल्यास पार्कींग असणे अनिवार्य राहील.
२) अशा इमारतीमध्ये पाणी, विजेची व्यवस्था असावी.
३) स्थलांतरीत ठिकाणी सदर उपकेंद्राकरीता आवश्यक त्या सर्व सोयी-सुविधा असाव्यात.

४) स्थलांतरीत ठिकाणी उपकेंद्राच्या मुख्य इमारत व निवासस्थानांच्या बांधकामाकरीता जिल्हा नियोजन व विकास मंडळाने त्यांच्या जिल्हा योजनेतून तरतूद करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२६१६०५२६९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c947 03436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b86 9fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d 63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2018.08.07 17:16:51 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सातारा.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सातारा.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, सातारा.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, सातारा.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
११. ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).